# अबियोयो

**लेखक: पीट सीगर, पॉल डु बोइस**

**मराठी अनुवाद: तृप्ती कर्णिक**



# अबियोयो

लेखक:  पीट सीगर, पॉल डु बोइस
मराठी  अनुवाद:  तृप्ती  कर्णिक



एक छोटी मुलगी शहरातल्या रस्त्यावर जेंबे वाजवत चालत होती.

Poom-i-ty, poom-poom, poom-i-ty, poom-poom.

तिचे बाबा उकुलेले हे तंतुवाद्य वाजवीत तर आई बासरी. ते तिघे मिळून घरगुती बँड चालवायचे. कुणाकडे लग्न, वाढदिवस किंवा काही समारंभ असला कि त्यांना बोलावलं जायचं.

पण त्यांचं छोटसं शहर एका मोठ्या संकटात सापडलं होतं.. गेली काही वर्षे शहर चोहीकडून वाढलं होतं. हिरव्यागार डोंगरांनी वसलेलं ते खोरं अगदी उजाड झालं होतं. प्रत्येक पावसाळ्यात पूर यायचा तर उन्हाळ्यात दुष्काळ.

आता काहीतरी करण्यावाचून पर्याय नव्हता...

सगळे लोक चर्चेसाठी एकत्र जमले. “आपण एखादं छोटसं धरण बांधलं तर,” लोक म्हणू लागले. “पावसाचं पाणी अडवलं तर उन्हाळ्यात तरी किमान आपली पाण्याची गरज भागू शकेल.”



खूप चर्चा आणि काळजीपूर्वक आखणी केल्यानंतर धरण बांधण्यासाठी नारळ फोडला. प्रत्येकाला काम करावं लागणार होतं. खोदकाम सुरु झालं..



पण अररे....

खोदायला लागल्यावर नेमका एक मोठा खडक लागला. वाटलं होतं त्यापेक्षा तो कितीतरी प्रचंड मोठा होता.

लोकांनी ठरवलं कि त्याच्या आजूबाजूला खणून बघूया. परंतु कितीही माती बाहेर काढली तरी तो खडक काही संपण्याचं चिन्ह दिसेना.

कसला अजस्त्र खडक होता तो!

त्यांनी त्यासाठी खूप तरफ आणले, मोठे दोर आणले, चिक्कार प्रयत्न केले. पण कसलं काय...तो दगड जागचा कणभर देखील हलवता येत नव्हता. काम पूर्ण ठप्प झालं.



त्या शहरामध्ये अजूनही जुन्या काळात होऊन गेलेल्या पूर्वीच्या राक्षसाच्या गोष्टी सांगितल्या जात होत्या. त्यातलीच एक गोष्ट होती अबियोयो राक्षसाची. तो ताडमाड उंच होता, तो माणसांना खायचा अशा अनेक कथा त्याच्याविषयी बोलल्या जायच्या. पण त्या छोट्या मुलीला माहित होतं कि अनेक वर्षांपूर्वी तिच्या आजोबांनी आणि बाबांनी जादूने अबियोयोला गायब करून त्याच्यापासून शहर वाचवलं होतं.

“बाबा,” ती छोटी मुलगी म्हणाली. “मला खात्री आहे कि अबियोयोच तो महाकाय दगड हलवू शकेल.”

तिचे बाबा हसून म्हणाले, ”हो, बहुदा जमेल त्याला.”

“मग आपण त्याला परत बोलावूयात ना? आजोबांकडे अजूनही जादूची छडी आहे. एकदा का अबियोयोने तो अजस्त्र खडक हलवला कि आजोबाना आपण त्याला परत गायब करायला सांगू.” ती म्हणाली



“काय?” आई दचकून म्हणाली. “माणसांना कच्चं गिळून टाकणाऱ्या अबियोयोला परत बोलवायचं?”

“आपण त्याच्यासाठी खूप सारे पदार्थ बनवूयात म्हणजे मग तो माणसांना खाणार नाही,” मुलगी म्हणाली.

“पण त्याच्यासाठी आपल्याला पुरेसं आणि चविष्ट जेवण बनवता नाही आलं तर?” आईने विचारलं.

“तर मग आपण अबियोयोसाठी खूप सारी गाणी म्हणू,” मुलगी म्हणाली. “तो आपल्याशी दुष्ट नाही वागणार.”

“गाणी?” बाबा म्हणाले. “त्याला गाणी आवडतील कि नाही हे आपल्याला कुठे ठाऊक आहे.”

“पण जर अबियोयोला नाही आणलं तर आपल्याला धरण बांधणं कधीच शक्य होणार नाही,” मुलगी म्हणाली.

खूप चर्चेअंती शेवटी दुपारी सगळेजण आजोबांकडे निघाले.



“अबियोयोला परत बोलवायचं?,” आजोबा काळजीने म्हणाले, “भुकेला राक्षस खूप भयंकर असतो.”

“पण त्याच्याशिवाय दुसरं कुणीही तो खडक बाजूला करू शकणार नाही,” मुलगी म्हणाली.

“तू बरोबर बोलते आहेस,” आजोबा म्हणाले. त्यांनी आपला जादूच्या सामानाचा पेटारा उघडला. त्यातून जादूची छडी बाहेर काढली आणि म्हणाले, ”ह्या जुन्या गोष्टी अजून काम करतात हे बघायला लागेल.”

जादू.....मग एका क्षणात त्यांनी मुलीचा झेंबे गायब केला.

“आजोबा, मला माझा झेंबे परत हवाय.”

जादू.....झेंबे परत आला.

“अरे व्वा! माझी जादू अजून शाबुद आहे तर,” आजोबा हसत म्हणाले.

मग पुढचे अनेक दिवस शहरातील सगळेजण चविष्ट जेवण बनवण्यात व्यस्त झाले. त्यांनी उत्तम गाण्यांचा सरावही केला.

एकदाचे, सगळे लोक स्वागतासाठी तयार झाले.

आजोबांनी खास लाकडे आणून खास आग पेटवली. एक विशिष्ट प्रकारची ज्योत आणि धूर तयार झाला. मग त्यांनी जादूची छडी गोल गोल फिरवली आणि जादूचा मंत्र म्हणू लागले........

... जादू!

.....जादू

आणि क्षणात अबियोयो प्रकट झाला. कसला अजस्त्र होता तो! विशाल झाडापेक्षा महाकाय! त्याची लांबलचक नखं, वेडेवाकडे दात आणि घाणेरड्या पायांकडे पाहून बायका किंचाळू लागल्या. मजबूत पुरुष चक्कर येऊन पडले. लोक ओरडू लागले.

“अबियोयो परत आला आहे.”

अबियोयोने एक जांभई दिली आणि हात सैलावून तो म्हणाला, “मला प्रचंड भूक लागली आहे.”



शहरातल्या लोकांनी स्पॅगेटी, टोफू, चिकन, भाजलेले मांस, कोलंबी, भात, भाज्या, फळं आणि असे अनेक चविष्ट पदार्थ भरभरून आणले होते.

अबियोयोने तोंडाचा आ केला.

एका घासात मोठ्याल्या ट्रेमधली स्पॅगेटी तर दुसऱ्या घासात स्ट्रॉबेरी केक गायब!

थोड्या वेळातच अबियोयोने सर्व जेवणाचा फडशा पाडला.

पोटावर हात फिरवत ढेकर दिली.

ती लहान मुलगी धीटपणे त्याच्या जवळ आली आणि तिने विचारले, “अबियोयो, तू पूर्वीइतकाच ताकदवान आहे का?”





“अर्थातच,” अबियोयो गर्जनेसारखा ओरडला.

“हा महाकाय खडक उचलून फेकण्याइतका ताकदवान?”

अबियोयोने तो विशाल दगड उचलला आणि आकाशात भिरकावून दिला. बापरे! १०० फुट उंच!

२०० फुट!

खाली कोसळला!

धड़ाम!

“अबियोयो झिंदाबाद!!” लोकांनी एकमेकांना आनंदाने मिठ्या मारल्या, नाचू लागले. कुत्रेही खुशीत येऊन भुंकू लागले.

“मला भूक लागली आहे,” अबियोयोची डरकाळी ऐकू आली.

“पण सगळे जेवण संपले आहे!” ऐकून अबियोयोच्या कपाळावर आठ्या उमटल्या.

त्या लहान मुलीने पटकन आपला जेंबे उचलला.

***धा धी धिडदा, धा धी धिडदा...***

तिच्या बाबांनी उकुलेले वाजवायला सुरुवात केली.

***प्लींक...इ..टी....प्लींक...प्लींक***

आईने बासरी घेतली आणि त्यांच्यात सहभागी झाली.

***तुतल..इ..टी..तुत..तूत***



*“हे माझं गाणं आहे!”*




A BI YO YO

BI YO YO

YO YO

सगळेजण अजून वेगाने वाजवू लागले.

YO

अजून वेगाने!

“अंअं...,”अबियोयोचा आवाज बारीक झाला.

**“मी खूप दमलोय.”**

तो आडवा झाला आणि पेंगू लागला. थोड्याच वेळात तो घोरू लागला.

“आता आपल्याला काहीतरी करता येऊ शकेल,” ती मुलगी खुशीत म्हणाली. “पण जादूची छडी घेऊन आजोबा कुठे बरं गायब झाले आहेत?”

“अरे बापरे! आजोबा, काय झालं तुम्हाला?” मुलीने रडवेल्या आवाजात विचारलं.

“मी ठीक आहे,” आजोबा म्हणाले. “हा भलामोठा दगड मला अगदी निसटून पडला.”

“पण तुमची जादूची छडी कुठे आहे,” मुलीने विचारले.

“कोण जाणे कुठे गेली,” आजोबा म्हणाले.

“ही बघा, इकडे आहे,” मुलीचे बाबा म्हणाले.

सगळ्यांची नजर तिकडे वळली. त्यांना ती तुटलेली छडी दिसली, नंतर तो घोरणारा राक्षस आणि मग ती छोटी मुलगी.

“तुझ्यामुळे हे सगळं झालंय,” शहरवासी म्हणाले. “आता तूच हे निस्तर.”

“मला वाटतं आता आपण एवढंच करू शकतो,” ती लहानगी म्हणाली. ”आपण अबियोयोसाठी भरपूर आणि चवदार खाऊ बनवूयात म्हणजे तो आपल्याला खाणार नाही. तसेच आपण त्याच्यासाठी सतत मधूर गाणी म्हटली तर तो खुशीत राहील.”

अशा प्रकारे थोड्याच दिवसात शहरवासीय अबियोयोबरोबर कसं राहायचं हे शिकले.

अबियोयोपण एका पडक्या घरात झोपायचा. आडवा झाला कि त्याचे डोके पुढील दारातून तर पाय मागील दारातून बाहेर यायचे. आपले वेडेवाकडे दात स्वतच करायलाही तो शिकला

अबियोयो आणि छोटी मुलगी व तिचे आईबबाबा ह्यांची घट्ट मैत्री झाली. ते एक कुटुंब म्हणूनच राहू लागले. त्याचे घाणेरडे पाय धुवायला ते त्याला मदत करत.

आणि शहरातले लोक?



अबियोयोच्या मदतीने लोकांनी धरणाचं काम पूर्ण केलं. लोक त्याला न विसरता पोटभर चविष्ट जेवायला घालायचे आणि चांगलं संगीत ऐकवायचे.

आणि आता अबियोयो सगळीकडे झाडे लावण्याच्या कामाला लागला आहे....

अंत

